**रस्ता सुरक्षा अभियान- २०१७**
**राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह (परिवहन) विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : एमव्हीआर-०११७/प्र.क्र.६/परि-२,**

गृह (परिवहन) विभाग,दुसरा मजला,
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०७ जानेवारी, २०१७.

**शासन परिपत्रक :-**

मोटार वाहन अपघातांस परिणामकारकरित्या आळा घालण्याच्या दृष्टीकोनातून विविध उपाययोजना शासन स्तरावर योजल्या जातात. तद्नुषंगाने, राज्यात रस्ता सुरक्षा अभियान दरवर्षी जानेवारी महिन्यामध्ये राबविले जाते. या अभियानाअंतर्गत परिवहन विभाग, पोलीस विभाग, आरोग्य विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, शालेय शिक्षण विभाग व इतर संबंधित संस्था/संघटनांच्या सहकार्याने रस्ता सुरक्षिततेसाठी प्रचार, जनजागृती व जनप्रबोधनाकरिता कार्यक्रम आयोजित करावयाचे आहेत. त्याकरिता दि.०९ जानेवारी, २०१७ ते दि.२३ जानेवारी, २०१७ या कालावधीत रस्ता सुरक्षा अभियान-२०१७ सबंध राज्यभर राबविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. रस्ता सुरक्षा अभियान - २०१७ करीता केंद्र शासनाने “Your Safety Secures your family - Be cautious on Road” हे घोषवाक्य दिले आहे. हे घोषवाक्य घेवून रस्ता सुरक्षेविषयी जनजागृती करण्यासाठी "**रस्ता सुरक्षा अभियानांतर्गत**" सोबत जोडलेल्या विवरणपत्रामध्ये नमूद केलेल्या कृती कार्यक्रमाची/ मार्गदर्शक सूचनांची काटेकोर अंमलबजावणी संबंधित विभागांच्या प्रमुखांनी सुनिश्चीत करावी.

३. राज्यातील प्रत्येक जिल्हयासाठी “जिल्हा रस्ते सुरक्षा समिती” गठीत करण्यात आली आहे. या समितीने रस्ता सुरक्षा अभियान-२०१७ च्या जिल्ह्यातील अंमलबजावणी /नियोजनाकरीता समितीची बैठक घेऊन संबंधितांना निर्देश द्यावेत व हे अभियान यशस्वी करावे.

४. या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई व अप्पर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी समन्वयक म्हणून कार्यवाही करावयाची असून याबाबत केलेल्या कार्यवाहीचा कार्यपालन अहवाल त्यांनी शासनास सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०१०७१७२६२३४७२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tikamdas N Shikharame

Digitally signed by Tikamdas N Shikharame
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Tikamdas N Shikharame
Date: 2017.01.07 17:49:03 +05'30'

**( टि. एन. शिखरामे )**
कक्ष अधिकारी, गृह (परिवहन) विभाग

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
२. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
३. मुख्य सचिव,
४. अपर मुख्य सचिव (गृह),
५. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय,
६. अपर मुख्य सचिव (अ. व सु.), गृह विभाग,
७. प्रधान सचिव (परिवहन), गृह विभाग,
८. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,
९. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग,
१०.सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,
११.प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय,
१२.सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,
१३.अपर पोलीस महासंचालक (वाहतूक),
१४.परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१५.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१६.महाव्यवस्थापक, बृहन्मुंबई परिवहन उपक्रम, मुंबई,
१७.उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई,
१८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ,मुंबई,
१९.संचालक, राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण, ठाणे/नाशिक/पुणे/नागपूर
२०.सर्व विभागीय आयुक्त,
२१.शिक्षण संचालक, (प्राथमिक व माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे,
२२.सर्व जिल्हाधिकारी,
२३.सर्व पोलीस आयुक्त,
२४.सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक/पोलीस उप आयुक्त,
२५.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
२६.सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,

२७.सर्व जिल्हा शल्य चिकित्सक,

२८. सर्व विभागीय नियंत्रक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ,

२९.सर्व प्रादेशिक परिवहन अधिकारी,

३०.सर्व उप प्रादेशिक परिवहन अधिकारी,

३१.सर्व उप आयुक्त, महानगरपालिका/मुख्याधिकारी,नगर पालिका/परिषद.

३२.मालवाहतूकदार संघटना (संबंधित प्रादेशिक /उप प्रादेशिक परिवहन कार्यालयामार्फत)

३३.निवडसंग्रह-परि-२.

''''''''

## शासन परिपत्रक, गृह विभाग, क्र. एमव्हीआर-०११७/प्र.क्र.६/परि-२ दिनांक : ०७ जानेवारी, २०१७ चे विवरणपत्र.
## परिवहन विभाग/पोलीस विभाग (महामार्ग) (वाहतूक पोलीस)

**१) चौकसभा घेणे :-** महत्वाच्या ठिकाणी चौकसभा घेवुन वाहन चालकांना मोटार वाहन कायदा व सुरक्षितरित्या वाहन चालविण्याची माहिती देणे.

**२) बॅनर्स लावणे :-** आपआपल्या हद्दीत महत्वाच्या ठिकाणी सहजपणे दिसु शकतील अशा प्रकारे बॅनर्स लावणे.

**३) माहितीपत्रके, हॅन्डबिल :-** माहितीपत्रके, हॅन्डबिल यांचे वाटप करणे.

**४) वाहनचालकांसाठी वाहतुक प्रबोधनपर कार्यशाळा आयोजित करणे :-** शहर/जिल्हा वाहतुक व महामार्गावरील महामार्ग पोलीस केंद्रावर वाहतुक प्रबोधनपर कार्यशाळा आयोजित करून चालकांना त्याच प्रमाणे नागरिकांना तसेच शालेय विदयार्थ्यांना वाहतुकीचे नियम, प्रवाश्यांची सुरक्षितता इत्यादीबाबत माहिती देणे.

**५) रिफ्लेक्टर लावणे :-** महामार्गावरून जाणाऱ्या वाहनांना तसेच बैलगाडयांना रिफ्लेक्टर लावणे.

**६) विशेष मोहिम :-** विशेष मोहिमा आखुन वाहतुक कायदयांतर्गत परिणामकारकरित्या केसेस करणे. उदा. मद्यपी वाहन चालकांवर कारवाई.

**७) मोटार वाहन केसेस :-** अवैद्य प्रवासी वाहतुक, ओव्हर लोडिंग इत्यादी केसेस परिणामकारकरित्या करणे, सराईतांचा परवाना, लायसन्स रद्द करणे.

**८) जनजागृती :-** लायसन्स/परवान्याविषयी जनजागृती करणे.

९) अपघाताच्या घटनेस कारणीभुत ठरणाऱ्या घटकांची माहिती देवुन त्यावर मोटार वाहन कायदयानुसार कारवाई करण्यासाठी स्थानिक पोलीस दल व ट्राफिक पोलीसांसोबत संयुक्त मोहिम राबविणे.

**१०) दुरध्वनी क्रमांकाचे बोर्ड :-** हद्दीतील रूग्णालये, ॲम्बुलन्स, क्रेन, पोलीस ठाणे, इत्यादीचे दुरध्वनी क्रमांक असलेले बोर्ड, अपघातग्रस्तांच्या मदतीसाठी महामार्गावर लावणे. पोलीस ठाणे हद्द दर्शविणारे बोर्ड सीमेवर लावणे.

**११) मोटार अपघात दाव्याची माहिती :-** मोटार अपघात दाव्याच्या संदर्भात माहिती व मार्गदर्शनपर पुस्तिका तयार करून त्यांचे वाटप करणे तसेच पोलीस ठाणे समोर व महामार्गावर मोटार अपघात दाव्याच्या संदर्भात माहितीचा बोर्ड लावणे.

**१२) शालेय विदयार्थ्यांचे प्रबोधन :-** रस्ते सुरक्षा विषयावर आपआपल्या हद्दीतील शाळांना भेटी देवुन शाळेतील विद्यार्थ्यांना माहिती देणे, तसेच शालेय विदयार्थ्यांची रॅली काढणे.

**१३) व्याख्यान आयोजन :-** पोलीस/ परिवहन अधिकारी/रस्ते सुरक्षिततेबाबत कार्य करणाऱ्या संस्था यांची रस्ते सुरक्षिततेच्या संदर्भात व्याख्याने आयोजित करणे.

**१४) वाहतुक गार्डनला भेट देणे :-** ट्रॅफिक गार्डनला भेट आयोजित करणे.

१५) रस्ते सुरक्षेबाबत निबंध स्पर्धेचे आयोजन करणे.

१६) घोषवाक्याच्या स्पर्धेचे आयोजन/ बक्षीस वितरण करणे.

**१७) अपघातांतील जखमींचा जीव वाचविणे व त्यांच्यावर तातडीने उपचार करणे** - " अपघातावेळी तेथे उपस्थित असलेल्या व्यक्तींचे (अशा व्यक्ती वैद्यकीय व्यावसायिक असोत, पोलिस असोत वा

सर्वसामान्य नागरीक) प्रथम प्राधान्य अपघातग्रस्त व्यक्तींचा जीव वाचविणे व त्यांना लवकरात लवकर वैद्यकीय उपचार मिळवून देणे, हे असले पाहिजे आणि अपघातग्रस्त व्यक्तींवर तातडीने उपचार करण्याऱ्या वैद्यकीय व्यावसायिकांना तसे करण्यामध्ये कोणताही कायदेशीर अडथळा/ त्रास संभवत नाही ", या सुप्रीम कोर्टाने दिलेल्या निकालास प्रसिद्धी देवून त्या माध्यमातून जनजागृती करावी.

''''''''''''''''''''''''''''''''''''

**शासन परिपत्रक, गृह विभाग, क्र. एमव्हीआर-०११७/प्र.क्र.६/परि-२**
**दिनांक : ०७ जानेवारी, २०१७ चे विवरणपत्र.**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**१) ब्लॅक स्पॉट :-** अपघात प्रवणक्षेत्राची माहिति घेवुन तेथे दुरूस्ती करणे, रस्त्याचे डिझाईनमध्ये बदल करणे.

**२) खड्डे दुरूस्ती :-** रस्त्यावरील खड्डे दुरूस्त करून घेणे.

**३) रस्ते तयार करणे :-** चांगल्या उत्कृष्ट दर्जाचे रस्ते तयार करणे.

**४) साईनबोर्ड व माहितीचे बोर्ड :-** आवश्यक त्या ठिकाणी सिग्नल्स लावणे त्याचप्रमाणे प्रवाश्यांच्या व वाहन चालकांच्या माहितीसाठी साईनबोर्ड व माहितीचे बोर्ड लावणे.

**५) दुभाजकाचे व रंगरंगोटीचे काम :-** रस्त्यावरील दुभाजकाचे काम करून घेणे व त्यांची रंगरंगोटी करणे.

**६) वाहतुक साधनांची दुरूस्ती :-** नादुरूस्त सिग्नल्स, खराब झालेले बोर्डस्, ब्लिंकर लॅम्प इत्यादीची दुरूस्ती करणे.

**७) झेब्रा क्रॉसिंग :-** महत्वाच्या जंक्शनवर पादचाऱ्यांना रस्ता ओलांडण्यासाठी झेब्रा क्रॉसिंगचे पट्टे आखुन घेणे.

**८) प्रवासी मार्गदर्शक बोर्ड लावणे.**

**९) रस्ता दुरूस्तीचे ठिकाणी सावधानतेचा इशारा व उपाययोजना.**

''''''''''''''''''''''''''

**शासन परिपत्रक, गृह विभाग, क्र. एमव्हीआर-०११७/प्र.क्र.६/परि-२**
**दिनांक : ०७ जानेवारी, २०१७ चे विवरणपत्र.**

**राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरण/राज्य रस्ते विकास महामंडळ**

**१) ब्लॅक स्पॉट:-** अपघात प्रवणक्षेत्राची माहिती घेवुन तेथे दुरूस्ती करणे, रस्त्याचे डिझाईनमध्ये बदल करणे.

**२) खड्डे दुरूस्ती :-** रस्त्यावरील खड्डे दुरूस्त करून घेणे.

**३) साईनबोर्ड व माहितीचे बोर्ड :-** आवश्यक त्या ठिकाणी सिग्नल्स लावणे त्याचप्रमाणे प्रवाश्यांच्या व वाहन चालकांच्या माहितीसाठी साईनबोर्ड व माहितीचे बोर्ड लावणे.

**४) दुभाजकाचे व रंगरंगोटीचे काम :-** रस्त्यावरील दुभाजकाचे काम करून घेणे व त्यांची रंगरंगोटी करणे.

**५) वाहतुक साधनांची दुरूस्ती :-** नादुरूस्त सिग्नल्स, खराब झालेले बोर्डस्, ब्लिंकर लॅम्प इत्यादीची दुरूस्ती करणे.

**६) झेब्रा क्रॉन्सीग :-** महत्वाच्या जंक्शनवर पादचाऱ्यांना रस्ता ओलांडण्यासाठी झेब्रा क्रॉसिंगचे पट्टे आखुन घेणे.

**७) प्रवासी मार्गदर्शक बोर्ड लावणे.**

**८) रस्ता दुरूस्तीचे ठिकाणी सावधानतेचा इशारा व उपाययोजना.**

''''''''''''''''''''

**शासन परिपत्रक, गृह विभाग, क्र. एमव्हीआर-०११७/प्र.क्र.६/परि-२**
**दिनांक : ०७ जानेवारी, २०१७ चे विवरणपत्र.**

## शालेय शिक्षण विभाग

**१) चर्चासत्राचे आयोजन :-** सर्व महाविद्यालय व शाळांमध्ये वाहतुकीचे नियम व सुरक्षिततेच्या दृष्टीने चर्चासत्र भरविणे तसेच व्याख्यानमाला व निबंध स्पर्धेचे आयोजन करणे, रस्ता सुरक्षा विषयाचा पाठयक्रमांत समावेश करणे. एनसीसी/एनएसएसच्या माध्यमातुन रस्ता सुरक्षा अभियान विद्यार्थ्यांपर्यंत पोहचविणे.

**२) चित्रकला स्पर्धा आयोजन :-** शाळांमध्ये रस्ते सुरक्षा विषयावर चित्रकला स्पर्धा आयोजन करणे.

**३) शाळा/महाविद्यालयामध्ये जनजागृती :-** निबंध स्पर्धा, वक्तृत्व स्पर्धा, शिबिरे, मेळावे, परिसंवाद यांचे आयोजन करून सुरक्षित वाहन चालविणेबाबत जनजागृती करणे.

''''''''''''''''''''''''''''''''

**शासन परिपत्रक, गृह विभाग, क्र. एमव्हीआर-०११७/प्र.क्र.६/परि-२**
**दिनांक : ०७ जानेवारी, २०१७ चे विवरणपत्र.**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**१) तालुकास्तरावर तसेच जिल्हास्तरावर मोठे तपासणी नाके, बाजार आगारे इत्यादी ठिकाणी वाहनचालकांची आरोग्य तपासणी/नेत्र तपासणी करणे.**

**२) रूग्णवाहीका पुरविणे :** - अपघातग्रस्तांच्या मदतीसाठी डॉक्टर्स स्टाफसह सुसज्ज रूग्णवाहीका पुरविणे.

३) माहितीचे बोर्ड लावणे : - रूग्णालये, रूग्णवाहीका इत्यादीच्या माहितीचे बोर्ड महामार्गावर लावणे.

**४) इमर्जन्सी टिम :-** अपघातग्रस्तांसाठी डॉक्टरांची **इमर्जन्सी टिम** तयार ठेवणे व त्याची माहिती, फोन नंबर महामार्गावर लावणे

**५) वैद्यकिय शिबिरांचे आयोजन :-** वाहन चालकांच्या वैद्यकिय तसेच आरोग्य तपासणीसाठी शिबिरांचे आयोजन करणे.

**६) चर्चासत्राचे आयोजन :** - आरोग्याच्या दृष्टीकोनातुन चर्चासत्राचे आयोजन करणे.

**७) गोल्डन अवर :-** अपघातातील जखमींना सुरवातीच्या पहिल्या तासात वैद्यकिय उपचार मिळवुन देणे.

**८) प्रथमोपचाराचे प्रशिक्षण:-** अपघातग्रस्तांना मदत करण्याच्या दृष्टीकोनातुन वाहतुक पोलीसांना प्रथमोपचाराचे प्रशिक्षण देणे.

९) **अपघातांतील जखमींचा जीव वाचविणे व त्यांच्यावर तातडीने उपचार करणे** § " अपघातावेळी तेथे उपस्थित असलेल्या व्यक्तींचे (अशा व्यक्ती वैद्यकीय व्यावसायिक असोत, पोलिस असोत वा सर्वसामान्य नागरीक) प्रथम प्राधान्य अपघातग्रस्त व्यक्तींचा जीव वाचविणे व त्यांना लवकरात लवकर वैद्यकीय उपचार मिळवून देणे, हे असले पाहिजे आणि अपघातग्रस्त व्यक्तींवर तातडीने उपचार करण्याऱ्या वैद्यकीय व्यावसायिकांना तसे करण्यामध्ये कोणताही कायदेशीर अडथळा/ त्रास संभवत नाही ", या सुप्रीम कोर्टाने दिलेल्या निकालास प्रसिद्धी देवून त्या माध्यमातून जनजागृती करावी.

-------------------------------

**शासन परिपत्रक, गृह विभाग, क्र. एमव्हीआर-०११७/प्र.क्र.६/परि-२**
**दिनांक : ०७ जानेवारी, २०१७ चे विवरणपत्र.**

**मालवाहतुकदार संघटना/ असोसिएशन**

**१) प्रशिक्षण शिबिरांचे आयोजन** - वाहन चालकांच्या प्रशिक्षण शिबिरांचे आयोजन करणे.

**२) आरोग्य तपासणी** - वाहन चालकांची आरोग्य तपासणी करणे

**३) रिफ्लेक्टर लावणे** - वाहनांना रिफ्लेक्टर लावणे

**४) माहितीपर पुस्तिकेचे प्रकाशन व वाटप** - रस्ता सुरक्षिततेच्या दृष्टीने मोटार वाहन कायदा व सुरक्षितपणे वाहन चालविण्याच्या बाबतीत माहितीपर पुस्तिकेचे प्रकाशन व वाटप करणे.

**५) परिसंवादाचे आयोजन** - रस्ता सुरक्षिततेच्या दृष्टीने परिसंवादाचे आयोजन करणे

**६) जनजागृती** - विविध उपक्रम हाती घेवुन वाहन चालकांची जनजागृती करणे.

**७) मार्गदर्शक पत्रिकेचे वाटप** - मार्गदर्शक पत्रिका छापुन त्याचे वाटप करणे.

''''''''''''''

**शासन परिपत्रक, गृह विभाग, क्र. एमव्हीआर-०११७/प्र.क्र.६/परि-२**
**दिनांक : ०७ जानेवारी, २०१७ चे विवरणपत्र.**

**महानगरपालिका/ नगरपालिका**

१) रस्त्यांची दुरूस्ती व देखभाल

**२) पादचाऱ्यांकरीता सोयी-सुविधा** - सिग्नल यंत्रणा अदयावत,ठेवणे, झेब्रा क्रॉसींग, पादचाऱ्यांसाठी फुटपाथ, फुटओव्हर ब्रीज, भुयारी मार्ग इत्यादी.

**३) ब्लॅक स्पॉट** - अपघात प्रवण क्षेत्रे शोधुन त्यावर उपाययोजना करणे, रस्ते दुरूस्ती करणे.

**४) चर्चा सत्राचे आयोजन** - रस्ते सुरक्षीततेच्या दृष्टीकोनातुन चर्चा सत्राचे आयोजन करणे.

**५) विविध उपक्रम** - रस्ते सुरक्षीततेच्या दृष्टीकोनातुन विविध उपक्रम हाती घेवुन जनजागृती, प्रबोधन करणे.

**६) जनजागृती** - वृत्तपत्रे, प्रसार माध्यम इत्यादीतुन जनजागृती करणे.

७) महानगर पालिका हद्दीतील ट्राफिक पार्क्सना शालेय विद्यार्थ्यांच्या भेटी आयोजित करणे.

**८) झेब्रा क्रॉसिंग** - महत्वाच्या जंक्शनवर पादचाऱ्यांना रस्ता ओलांडण्यासाठी झेब्रा क्रॉसिंगचे पट्टे आखून घेणे.

''''''''''''''''''

**शासन परिपत्रक, गृह विभाग, क्र. एमव्हीआर-०११७/प्र.क्र.६/परि-२**
**दिनांक : ०७ जानेवारी, २०१७ चे विवरणपत्र.**
**महिती व जनसंर्पक संचालनालय, महाराष्ट्र राज्य**

**१) पुस्तिका प्रसिध्द करणे** - रस्ते सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातुन पुस्तिका प्रसिध्द करणे.

**२) भित्तीपत्रके** - अपघातासंबधी व त्याच्या परिणामा बाबत भित्तीपत्रके एस.टी बसेस व इतर प्रवासी वाहतुक वाहनांवर लावणे

**३) ठळक ठिकाणी बोर्ड लावणे** - अपघातग्रस्तांना मदत करणे संदर्भात महामार्गावर ठळक ठिकाणी बोर्ड लावणे.

**४) घोषवाक्ये** - महामार्गावर ठिकठिकाणी वाहतुक नियमांच्या संदर्भात घोषवाक्य असलेले बोर्ड लावणे.

**५)** सर्व एफ. एम. चित्रपट गृहे व दुरचित्र वाहिन्यांशी संर्पक करून रस्ता सुरक्षा अभियाना विषयी जास्तीत जास्त प्रबोधन करणे.

**६)** रस्ता सुरक्षा, मानवी जीवन व अपघाताविषयी जाहिरात, जनजागृती व प्रबोधन करणे.

''''''''''''''''''''

**शासन परिपत्रक, गृह विभाग, क्र. एमव्हीआर-०११७/प्र.क्र.६/परि-२**
**दिनांक : ०७ जानेवारी, २०१७ चे विवरणपत्र.**

**महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ**

१) वाहन चालकांची प्रबोधन शिबीर घेणे.
२) वाहन चालकांची नेत्र/आरोग्य तपासणी शिबीर घेणे.
३) एस. टी. वाहनातून रस्ते सुरक्षिततेसंदर्भात कायम स्वरुपी फिरते प्रदर्शन आयोजित करणे.
४) एस.टी. बस स्टेशन/ आगारे/थांबे येथे रस्ते सुरक्षिततेबाबत जाहिरात फलक प्रदर्शित करणे.
५) अपघात प्रवण वाहनचालकांसाठी समुपदेशन/सिम्युलेटर प्रशिक्षण इ.चे आयोजन करणे.
६) बस स्थानकामधील उद्घोषणांची (Public Address System) सुरक्षित प्रवासाबाबत घोषणा/सूचना देणे
७) एस.टी. बसेसमधील Video Coaches मध्ये रस्ते सुरक्षिततेबाबत जाहिरात/ सुचना प्रसारित करणे.

-----------